नागपुर विभागातील नायब तहसिलदार या संवर्गातील तदर्थ पदोन्नत्या नियमित करण्याबाबत (निवडसूची सन २०२३-२४).

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः पदोन्न -२०२३/प्र.क्र.२३३ /ई-९**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०१ ऑगस्ट, २०२४.

वाचा :-

१) उप आयुक्त, नागपुर विभाग, नागपुर यांचे पत्र क्र. मशा६(३)/आस्था-१/सीआर-२२/२०२३/ कावि१०४२/२०२३ दि.२४.११.२०२३ व दि.१५.१२.२०२३

**शासन आदेश:-**

नागपुर विभागातील अव्वल कारकून व मंडळ अधिकारी संवर्गातील खालील कर्मचाऱ्यास सन २०२३-२४ या निवडसूची वर्षात विभागीय आयुक्त नागपुर यांच्या अध्यक्षतेखाली विभागीय पदोन्नती समितीच्या दिनांक २४.११.२०२३ व दिनांक १५.१२.२०२३ च्या बैठकीमध्ये केलेल्या शिफारसी व सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सहमतीनुसार नायब तहसिलदार या संवर्गात दिलेल्या तदर्थ पदोन्नत्या पदोन्नतीच्या कोट्यातील उपलब्ध नियमित पदावर ते सध्या कार्यरत असलेल्या पदावरच नियमित करण्यात येत आहे.

**१) अव्वल कारकून संवर्ग (१): -**

| अ.क्र | दि.१.१.२०२३ नुसार ज्येष्ठता क्रमांक | दि.१.१.२०२० नुसार ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्यांची नावे | प्रवर्ग |
|---|---|---|---|---|
| १ | ** | ३१२ | श्रीमती व्ही. एम. सावरबांधे (दिव्यांग प्रवर्ग-कर्णबधीर) | इ.मा.व. |

**२) मंडळ अधिकारी संवर्ग (१) :-**

| अ.क्र | दि.१.१.२०२३ नुसार ज्येष्ठता क्रमांक | दि.१.१.२०२० नुसार ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्यांची नावे | प्रवर्ग |
|---|---|---|---|---|
| १ | १३६ | २१६ | श्री. व्ही. आर. राठोड (दिव्यांग प्रकार-कर्णबधीर) | विजा अ |

२. उपरोक्त नायब तहसिलदारांच्या तदर्थ पदोन्नती, पदोन्नतीच्या कोट्यातील उपलब्ध नियमित पदावर खालील अटींच्या अधीन राहून नियमित करण्यात येत आहे:-

१) निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.

२) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६ब कार्यासनाच्या दि.७.५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच, दिनाक ७ मे,२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर सहमती देण्यात येत आहे.

३) दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत सा.प्र.वि/१६-अ यांनी दि.२०.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे.

४) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

५) निवडसूचीतील सर्व अधिका-यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषाची पूर्तता केली आहे. या अटीच्या अधिन सदर मान्यता दर्शविण्यात येत आहे.

३. सदरची पदोन्नती सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१५(सेवा २)/का.१२, दि.११.०१.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अधीनतेने देण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०२१२४४३४९४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKANT
MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2024.08.02 13:01:12 +05'30'

**(श्रीकांत म. मोहिते)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

विभागीय आयुक्त, नागपुर विभाग, नागपुर.

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
५. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
६. संबंधित जिल्हाधिकारी.
७. प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) नागपूर.
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
९. संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त, नागपुर विभाग, नागपुर यांच्यामार्फत).
१०. निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.